**अधीक्षक अभियंता,सांगली पाटबंधारे मंडळ,सांगली यांच्या अधिपत्याखालील बांधकाम कार्यप्रणालीतील लघु पाटबंधारे विभाग,सांगली विभाग व ३ उपविभाग विभागातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि.०१/०३/२०२४ ते ३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मुवाढ-२०२४/(१३८/२०२४)/लपा**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १८/०३/२०२४

**पहावे :** १) शासन निर्णय क्रमांकः- मुवाढ २०२३/(४३३/२०२३)/लपा,दिनांक १०/१०/२०२३.
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र. ०८/१६/आ.पु.क, दि.२१/०२/२०२४
३) अधीक्षक अभियंता,सांगली पाटबंधारे मंडळ,सांगली यांचे पत्र जा.क्र.सांपामं/भांडार/८३९/२०२४, दि.१६/०१/२०२४.

**प्रस्तावनाः-**

संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता,सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली अंतर्गत बांधकाम कार्यप्रणालीतील लघु पाटबंधारे विभाग,सांगली या कार्यालयातील विभाग व ३ उपविभाग नियत अस्थायी आस्थापनेवरील ८० पदांना दि.०१/०९/२०२३ ते दि. २९/०२/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

संदर्भ क्र.२ वित्त विभागाचे शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी अस्थापनेवरील पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत.

**शासन निर्णयः-**

आता संदर्भ क्र.३ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविल्याप्रमाणे अधीक्षक अभियंता,सांगली पाटबंधारे मंडळ,सांगली अंतर्गत बांधकाम कार्यप्रणालीतील लघु पाटबंधारे विभाग,सांगली व ३ उपविभागातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत खालील अटींचे अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदे, सदर कर्मचारी कार्यरत असेपर्यंत चालु राहतील .
२) उपरोक्त पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.
३) मुदतवाढ मंजुरी द्यावयाची नियत अस्थायी पदे विहित आकृतीबंधातील असावीत व ही पदे सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त/व्यपगत झालेली नसतील.
४) अधीक्षक अभियंता,सांगली पाटबंधारे मंडळ,सांगली यांच्या कार्यालयाने उपलब्ध करुन दिलेल्या प्रस्तावामधील पदांची संख्या/पदांमधील घट/पदांमधील वाढ/सेवानिवृत्ती इ.माहिती अंतिम/ अचूक आहे असे गृहित धरुन त्यांचे मागणीनुसार पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.
५) या सर्व पदांचा पुढील मुदतवाढीचा प्रस्ताव विहित प्रपत्रात प्रमाणपत्रासह विनाविलंब सादर करण्यात यावा.

"नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांचा खर्च हा मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशिर्ष ४७०१, मोठे,मध्यम व लघु पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे (०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळांना भाग भांडवली अंशदान (वेतन) (०४) (०१), महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अशंदान (अनिवार्य) ( ४७०१ आय १६२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

हा निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क,दिनांक २१/०२/२०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३१८१३००४५७२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VARSHA SANDEEP BHAGAT

Digitally signed by VARSHA SANDEEP BHAGAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=b200b2df2a6c4331b4a626db8cf6d32f7b30a2c5514afe21882df51ab8cdaad2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2711C10FA6CF7DA605799BE6228F533334F260EDEE79F096333766DAB604E021, cn=VARSHA SANDEEP BHAGAT
Date: 2024.03.18 13:09:53 +05'30'

( वर्षा भगत )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- परिशिष्ट "अ"**

**प्रत :-**

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र,मुंबई
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
मुख्य अभियंता (जसं),जलसंपदा विभाग, पुणे
अधिक्षक अभियंता,सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग,सांगली
कक्ष अधिकारी (अर्थ-२),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
कक्ष अधिकारी आ (प्रशि) कार्यासन, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई
आ (पुनर्रचना),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई
कोषागार अधिकारी,जिल्हा कोषागार कार्यालय,सांगली
लपा कार्यासन,संग्रहार्थ.

**कार्यालयाचे नाव - अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ,सांगली अंतर्गत बांधकाम कार्यप्रणालीतील लघु पाटबंधारे विभाग,सांगली व ३ उपविभाग**

| परिशिष्ट - अ | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| (शासन निर्णय क्र.मुवाढ-२०२४/(१३८/२०२४)/लपा, दिनांक.१८/०३/२०२४ चे सहपत्र) | | | | | | |
| नियत अस्थायी आस्थापनेवरील पदे दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत चालू ठेवणेबाबत | | | | | | |
| अ.क्र. | पदनाम | ल.पा.वि. सांगली मिरज कुपवाड | ल.पा.उप विभाग १, विटा | ल.पा.बांधकाम उप विभाग,जत | ल.पा.बांधकाम उप विभाग, आटपाडी | एकूण |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** |
| १ | कार्यकारी अभियंता | १ | ० | ० | ० | १ |
| २ | उप कार्य.अभियंता | १ | ० | ० | ० | १ |
| ३ | उप विभागीय अभि. | ० | १ | १ | १ | ३ |
| ४ | स.अ.२/शा.अ./क.अ. | ४ | २ | ४ | ४ | १४ |
| ५ | प्रथम लिपीक | १ | ० | ० | ० | १ |
| ६ | विभागीय लेखापाल | १ | ० | ० | ० | १ |
| ७ | आरेखक | १ | ० | ० | ० | १ |
| ८ | सहा.आरेखक | १ | ० | ० | ० | १ |
| ९ | अनुरेखक | ० | ० | १ | १ | २ |
| १० | स्था.अ.सहा. | ० | ४ | ४ | ४ | १२ |
| ११ | भांडारपाल | १ | ० | ० | ० | १ |
| १२ | वरिष्ठ लिपिक | ५ | ० | १ | १ | ७ |
| १३ | कनिष्ठ लिपिक | ४ | १ | २ | २ | ९ |
| १४ | लघु टंकलेखक | १ | ० | ० | ० | १ |
| १५ | टंकलेखक | ३ | १ | १ | १ | ६ |
| १६ | सहा.भांडारपाल | १ | ० | ० | ० | १ |
| १७ | संगणक | १ | ० | ० | ० | १ |
| १८ | वाहनचालक | १ | १ | १ | १ | ४ |
| १९ | नाईक | १ | ० | ० | ० | १ |
| २० | शिपाई | ५ | ० | २ | २ | ९ |
| २१ | चौकीदार | १ | ० | १ | १ | ३ |
| | एकूण | **३४** | **१०** | **१८** | **१८** | **८०** |

VARSHA SANDEEP BHAGAT

Digitally signed by VARSHA SANDEEP BHAGAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=b200b2df2a6c4331b4a626db8cf6d32f7b30a2c5514afe21882df51ab8cdaad2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2711C10FA6CF7DA605799BE6228F533334F260EDEE79F096333766DAB604E021, cn=VARSHA SANDEEP BHAGAT
Date: 2024.03.18 13:10:11 +05'30'

**(वर्षा भगत)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**